अपंग कर्मचा–यांना गट क आणि गड ड मधील पदांवर पदोन्नतीने 3 टक्के आरक्षण विहीत करण्याबाबत...

महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्र. एस आर व्ही 1099/प्र.क्र.37/99/16 अ
मंत्रालय, मुंबई 32
दिनांक 5 मार्च 2002

संदर्भ

1. केंद्र शासनाचे क्र.36035/8/89 इएसटी एससीटी दिनांक 20.11.1989 चे कार्यालयीन ज्ञापन
2. केंद्र शासनाचे क्र.36035/7/95 इएसटी एससीटी दिनांक 18.2.1997 चे कार्यालयीन ज्ञापन
3. केंद्र शासनाचे क्र.36025/03/97 इएसटी एससीटी दिनांक 4.7.1997 चे कार्यालयीन ज्ञापन

शासन निर्णय

केंद्र शासनाने त्यांच्या दिनांक 20.11.1989 च्या कार्यालयीन ज्ञापनाव्दारे अपंग कर्मचा–यांना गट क मधून गट ड मधील आणि गड ड मधून गट क मधील नियुक्ती करीता योग्य ठरविलेल्या पदांवर पदोन्नतीमध्ये 3 टक्के आरक्षण विहित केले आहे. तसेच दिनांक 18 फेब्रुवारी 1997 आणि दिनांक 4 जुलै 1997 च्या कार्यालयीन ज्ञापनान्वये याबाबतची कार्यपध्दती विहित केली आहे. केंद्र शासनाप्रमाणे राज्य शासकीय / निमशासकीय सेवेत गट क आणि गड ड मधील नियुक्तीसाठी योग्य ठरविलेल्या पदांवर अपंग कर्मचा–यांना पदोन्नतीमध्ये 3 टक्के आरक्षण विहित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

2 केंद्र शासनाच्या धोरणास अनुसरुन शासन असे आदेश देत आहे की, राज्य शासनाच्या सेवेतील गट क व गट ड मधील अंध / अल्पदृष्टी कर्णबधिर आणि अस्थिव्यंग या अपंग कर्मचा–यांना पदोन्नतीत प्रत्येकी 1 टक्के याप्रमाणे एकूण 3 टक्के आरक्षण विहित करण्यात यावे. पदोन्नतीमधील हे आरक्षण गट क मधून गट क मधील पदांसाठी गट ड मधून गट ड मधील पदांसाठी आणि गट ड मधून गट क मधील पदांसाठी अपंगांच्या नियुक्तीस योग्य ठरविलेल्या पदांकरीता असेल. अपंग कर्मचा–यांच्या पदोन्नतीसाठी विचार करताना शासनाने वेळोवेळी विहित केलेले पदोन्नतीसंबंधातील नियम, आदेश व निकष उदा पदोन्नती लगतच्या पदावरील किमान सेवेचा कालावधी विहित विभागीय / सेवा प्रवेशोत्तर प्रशिक्षण परिक्षा, गोपनीय अहवाल यानुसार कार्यवाही करण्यात यावी. पदोन्नती संदर्भात क्रमावार बिंदू नामावली व कार्यपध्दती या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्टात दर्शविण्यात आली आहे.

3 हे आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून शासकीय सेवा, सर्व शासकीय मंडळे/महामंडळे, स्थानिक स्वराज्य संस्था, जिल्हा परिषदा, महानगरपालिका, नगरपालिका आणि शासनाच्या अधिपत्याखालील किंवा शासनाने अनुदान दिलेली मंडळे, अनुदानित संस्था यांना लागू होतील तथापी, ज्या प्रकरणी पदोन्नतीची प्रक्रीया या आदेशाच्या दिनांकापासून सुरु झाली असेल त्या प्रकरणी हे आदेश लागू होणार नाहीत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

द. दा. देशपांडे
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

GR-20020925121131000-1500

शासन निर्णय क्र.एसआरव्ही 1099/प्र.क्र.37/99/16अ, दिनांक 5 मार्च 2002 चे परिशिष्ट

## अपंग कर्मचा-यांना गट क मधील, गट ड मधून गट ड मधील आणि गट ड मधून गट क मधील पदोन्नती व कमवार बिंदू नामावली वापरण्यासंबधीची कार्यपध्दती

1 अ—विभाग प्रमुख कार्यालय प्रमुख यांनी 1—अंध, अल्पदृष्टी, 2—कर्णबधिर आणि 3—अस्थिव्यंग या प्रवर्गातील अपंग कर्मचा—यांना गट क मधील, गट ड मधून गट ड मधील आणि गट ड मधून गट क मधील नियुक्तीस योग्य ठरविलेल्या पदांवर पदोन्नतीमध्ये 3 टक्के पर्यंत आरक्षण देण्यासाठी 100 रिक्त पदांची नियुक्तीस योग्य ठरविलेल्या पदांची पदनिहाय स्वतंत्र नोंदवही ठेवावी. त्यामधील क्र.1, 34 आणि 67 हे बिंदू अपंगांसाठी आरक्षित करण्यात यावेत. विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख यांनी क्रमांक 1 वर मूळ संवर्गातील कोणत्याही एका अपंग प्रवर्गाच्या जेष्ठतम कर्मचा—यांचा प्रथम विचार करावा. म्हणजेच जर मूळ संवर्गामधील जेष्ठतम कर्मचारी अस्थिव्यंग प्रवर्गातील असेल तर नोंदवहीतील क्रमांक 1 हा त्यांच्या पदोन्नतीकरीता वापरण्यात यावा. तथापी, अपंगांच्या अंध / अल्पदृष्टी, कर्णबधिर व अस्थिव्यंग विविध प्रवर्गासाठी योग्य प्रकारे आरक्षण आळीपाळीने राहील याची विभाग प्रमुखांनी खात्री करणे आवश्यक आहे. अपंग कर्मचा—यांस त्यांच्या अपंग प्रवर्गानुसार त्यांना नोंदवहीत आरक्षित केलेल्या बिंदूनुसार पदोन्नती देताना त्यास त्यांच्या सामाजिक आरक्षण / खुल्या प्रवर्गानुसार उदा अ.जा., अ.ज., खुला बिंदूनामावलीमध्ये दर्शविण्यात यावे.

उदा. — जर एखादया वर्षात अपंग कर्मचा—यांकरीता कमवार बिंदू नामावलीनुसार दोन पदे आरक्षित करण्यात आली असतील आणि या दोन पदांपैकी एका पदावर अनुसूचीत जाती व अन्य पदावर खुल्या प्रवर्गातील अपंग कर्मचा—यांची पदोन्नतीने नेमणूक करण्यात आली असेल, तर अनुसूचीत जातीच्या अपंग कर्मचा—यास बिंदूनामावलीत अ.जा. बिंदूवर आणि खुल्या प्रवर्गातील अपंग कर्मचा—यास खुल्या प्रवर्गासमोर दर्शविण्यात यावे.

काही प्रकरणी जर पदोन्नतीकरीता उपलब्ध असलेली रिक्त पदे कमी असतील आणि समोर एकही रिक्त पद अनुसूचीत जाती किंवा अनुसूचित जमातीच्या आरक्षीत बिंदूसमोर दर्शविण्यात आला नसेल, परंतु नोंदवहीतील बिंदूनुसार त्यापैकी एक रिक्त पद अपंग कर्मचा—यांकरीता आरक्षित केले आहे आणि पदोन्नतीकरीता उपलब्ध असलेला अपंग कर्मचारी सामाजिक आरक्षणानसार मागासवर्गीय राखीव प्रवर्गातील असेल तर त्यानंतर उपलब्ध असलेला रोस्टरवरील बिंदू संबंधीत मागास प्रवर्गास आरक्षण असलेला संबंधीत अपंग प्रवर्गातील आरक्षित अपंग उमेदवारास समायोजित करण्यासाठी वापरण्यात यावा.

उदा — जर उपलब्ध तीन रिक्त पदे पदोन्नतीच्या बिंदूनामावलीतील बिंदू क्रमांक 8, 9, 10 या खुल्या प्रवर्गासमोर दर्शविण्यात आली. त्यापैकी 1 रिक्त पद अपंग कर्मचा—यांसाठी नोंदवहीतील बिंदूना आरक्षित आहे आणि जर अपंग प्रवर्गानुसार निवड केलेला कर्मचारी अनुसूचित जातीचा असेल तर त्यास त्यानंतर उपलब्ध होणा—या अनुसूचित जातीच्या बिंदूसमोर बिंदूनामावलीत क्रमांक 12 वर दर्शविण्यात येवून समायोजित करावे.

ब—अपंगांसाठी रिक्त असलेली पदे, पदोन्नती आणि निवडीने भरती सर्वसाधारण पदोन्नती क्षेत्रातील अपंग कर्मचा—यांचा विचार करावा. मात्र जेथे संबंधित प्रवर्गानुसार पुरेसे कर्मचारी सर्वसाधारण पदोन्नती उपलब्ध नसतील, तेथे सर्वसाधारण पदोन्नती 65 पट वाढवावे आणि त्यानुसार उपलब्ध होणा—या अपंग कर्मचा—यांचा विचार करावा. परंतु सर्वसाधारण पदोन्नती क्षेत्र वाढवूनही अपंग कर्मचारी उपलब्ध झाले नाहीत, तर हे आरक्षण पुढील तीन भरती वर्षाकरीता पुढे ओढावे व नंतर व्यपगत करावे. मात्र सदर रिक्त पद / पदे नियुक्तीस योग्य ठरविलेल्या अन्य अपंग प्रवर्गातील अदलाबदलीने बदलून, पदोन्नतीसाठी सदर अपंग प्रवर्गाच्या कर्मचा—याचा विचार करावा.

क-अपंगांकरीता जे पद / पदे पदोन्नती देवून पदोन्नतीने भरावयाचे आहे, त्याकरीता सुयोग्य अपंग कर्मचा-यांचा अपंग प्रवर्गानुसार आरक्षित पदाकरीता पदोन्नतीसाठी विचार करावा. जर अपंग प्रवर्गानुसार अपंग कर्मचारी पदोन्नतीसाठी पात्र / उपलब्ध झाला नाही तर, हे आरक्षण पुढील तीन भरती वर्षाकरीता पुढे ओढावे व नंतर व्यपगत करावे. मात्र सदर रिक्त पद / पदे नियुक्तीस योग्य ठरविलेल्या अन्य अपंग प्रवर्गात बदलाबदलीने बदलून पदोन्नतीसाठी सदर अपंग प्रवर्गाच्या कर्मचा-याचा विचार करावा.

ड- ज्या गट/संवर्गात सरळ सेवेने करावयाच्या नियुक्तीचे प्रमाण 75 टक्के पेक्षा जास्त नसेल, अशाच गट / संवर्गातील अपंग कर्मचा-यांना पदोन्नतीमध्ये आरक्षण राहील.

2 पदोन्नतीमध्ये आरक्षण विहीत करताना केंद्र शासनाच्या दिनांक 20.11.1989 च्या आदेशातील खालील मुदयांचाही विचार करण्यात यावा.

ज्या अपंग प्रवर्गाकरीता पद / पदे नियुक्तीकरीता योग्य ठरविण्यात आली आहेत त्याच पदांपुरते हे आरक्षण मर्यादित असेल. अपंग प्रवर्गातील संबंधीत व्यक्ती पदोन्नतीचे पद समर्थपणे धारण करु शकत असेल तरच हे आरक्षण कार्यान्वित होईल.

जर समुचित अपंग प्रवर्गातील व्यक्ती मूळ श्रेणीत पुढील उच्च श्रेणीतील अपंगांसाठी नियुक्तीकरीता योग्य ठरविलेल्या पदांवरील पदोन्नतीसाठी उपलब्ध होत नसेल तर परस्पर अदलाबदलीस खालील अटींच्या अधीन राहून परवानगी देण्यात यावी.

एक-ज्या पदावर पदोन्नती दयावयाची आहे त्या पदाच्या मूळ श्रेणीत त्या अपंग प्रवर्गातील व्यक्ती उपलब्ध असली पाहिजे.
दोन-अशा प्रकारे अदलाबदल करण्यात आलेले आरक्षण पुढील तीन भरती वर्षापर्यंत पुढे ओढण्यात येईल व तदनंतर व्यपगत होईल.

---